**शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (बी.एस.यु.पी.) या योजनेसाठीच्या सन २०१०-११ या वर्षाकरीता केंद्र शासनाच्या हिश्श्याची तरतूद वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
गृहनिर्माण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-जनेयो-२०१०/प्र.क्र.१०४/गृनिधो-२(सेल),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १५.२.२०११

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-खर्चनि-१०.६०/प्र.क्र.-१/अर्थोपाय, दि. २०.४.२००६ .
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक-जनेयो-२००७/प्र.क्र.-५२/गृनिधो-२, दि. २५.०६. २००७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पूरक-१०.७०/प्र.क्र.-२३१/अर्थसंकल्प-३, दि. १०.८.२००७
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-खर्चनि -१०. ०७/प्र.क्र.-१४/अर्थोपाय, दि.२.०६.२००७
५) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक-जनेयो-२००६/प्र.क्र.-४६/गृनिधो-२, दि. १८.०९. २००६.
६) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक-केनिधी-२००७/प्र.क्र.-११७/गृनिधो-२,दि. १४.०९. २००७.
७) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक-जनयो-२००८/प्र.क्र.-८३/गृनिधो-२,दि. १५.०३.२००८.
८) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्रमांक-जनेयो-२००८/प्र.क्र.- ३८/गृनिधो-२, दि. ३१.०३.२००८.
९) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-जनेयो-२००८/प्र.क्र.- ६८/गृनिधो-२, दि. ८.०७.२००८.
१०) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-जनयो-२००८/प्र.क्र.-६८/गृनिधो-२, दि.२१.०२.२००८.
११) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-वाटप प्र.क्र.-४०/अर्थसंकल्प-१/,दि.२६.०३.२००९.
१२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-जनयो-२००८/प्र.क्र.-६८/गृनिधो-२, दि.३१.०३.२००९.
१३) शासनाचे पत्र क्र. संकीर्ण २००९/आर५०५/ गृनिधो-२(सेल) दि.०९.०७.२००९.
१४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-जनयो-२००९/प्र.क्र.-६६/गृनिधो-२/सेल, दि.२६.११.२००९
१५) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-जनयो-२००९/प्र.क्र.-६६/गृनिधो-२/सेल, दि.१९.०३.२०१०
१६) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्रमांक-जनयो-२००९/प्र.क्र.-६६/गृनिधो-२/सेल, दि.३०.०३.२०१०
१७) शासन निर्णय,गृहनिर्माण विभाग,क्रमांक-जनयो-२०१०/प्रक्र-१०४ अ/गृनिधो-२/सेल, दि.३१.०८.२०१०
१८) शासन निर्णय,गृहनिर्माण विभाग,क्रमांक-जनयो-२०१०/प्रक्र-१०४ /गृनिधो-२/सेल, दि. २४.१२.२०१०
१९) शासन निर्णय,गृहनिर्माण विभाग,क्रमांक-जनयो-२०१०/प्रक्र-१०४ /गृनिधो-२/सेल, दि. २१.०१.२०११.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाने शहरी भागातील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचावण्यासाठी घोषित झोपडपट्ट्यांमध्ये राहणा-या तसेच झोपडपट्ट्यातील आरोग्यास अपायकारक अशा परिस्थितीत राहणाऱ्या झोपडपट्टीवासियांसाठी जवाहरलाल नेहरु राष्ट्रिय नागरी पुनरुत्थान कार्यक्रम (JN-NURM) हा कार्यक्रम लागू केलेला आहे. या कार्यक्रमामध्ये "शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे," या उपकार्यक्रमाचा समावेश करण्यात आला आहे. शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे हा उप कार्यक्रम राज्यातील मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, नांदेड या पाच नागरी संकुलामध्ये संदर्भाधिन दि.२५ जून,२००७ च्या शासन निर्णयान्वये अंमलबजावणी करण्यात येत आहे. शहरी गरीबांकरिता मुलभूत सुविधा पुरविणे हे या कार्यक्रमाचे मुलभूत उद्दिष्ट आहे.

२.	केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे बीएसयूपी उपकार्यक्रमांतर्गत केंद्र/राज्य शासन ५०:५० (लाभार्थ्यांच्या हिश्श्यासह) या प्रमाणात निधि खर्च करावयाचा आहे. या योजनेची अंमलबजावणी करतांना शासनाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाची राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण (नोडल एजन्सी) म्हणून संदर्भ क्रमांक ४ अन्वये नेमणूक केली आहे.

३.	"शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे" या कार्यक्रमांतर्गत सन २०१०-११ या वित्तीय वर्षामध्ये केंद्र शासनाच्या हिश्यापोटी रु.६६९.९६५१ कोटी इतकी एकूण तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून यापैकी वित्त विभागाने दिलेल्या मंजुरीनुसार रु.१२४७६.९१ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. आता वित्त विभागाने दिलेल्या मंजुरीनुसार प्राप्त झालेल्या तरतूदीमधून केंद्र शासनाच्या हिश्यापोटी केंद्र शासनाकडून प्राप्त जानेवारी, २०११ पर्यंत रु.१४२७१.१२ लक्ष (रुपये चौदा हजार दोनशे एकाहत्तर लक्ष बारा हजार फक्त) इतकी रक्कम सोबतच्या विवरणपत्रानुसार संबंधित नागरी स्वराज्य संस्थांना/ अंमलबजावणी यंत्रणाला वितरीत करण्यासाठी राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणास या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे. केंद्र शासनाकडून निधी प्राप्त करुन घेणे तसेच प्राप्त निधीचे सनियंत्रण करणे ही सुकाणू अभिकरणाची जबाबदारी आहे. सबब केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या अनुषंगाने राज्य शासनाचा हिस्सा वितरीत होण्याची आवश्यकता पाहता, तसा प्रस्ताव सुकाणू अभिकरणाने शासनास त्वरीत सादर करावा. तसेच या पुढे केंद्र शासनाने संबंधीत शहरी गरिबांना मुलभूत सुविधा पुरविणे व एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टीविकास कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाचा निधी वितरीत केल्याबाबत संबंधीत संकेत स्थळावरुन दररोज माहिती घेऊन त्या प्रकल्पांचा केंद्र व त्याअनुषंगाने राज्य हिस्सा वितरणाचा प्रस्ताव अभिकरणाच्या अभिप्रायासह चार दिवसांत शासनास सादर होईल याचीही दक्षता घ्यावी.

४.	प्राधिकरणाने सदरची रक्कम खर्च करण्यासाठी अवर सचिव, गृहनिर्माण विभाग(आहरण व संवितरण अधिकारी) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले विहित प्रपत्रातील सदर रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास याच महिन्यात सादर करण्याची दक्षता घ्यावी.

५.	महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास यांचे मार्फत प्रस्तुत निधी अंमलबजावणी करणा-या नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांना सदर योजनेचा निधी वितरीत करताना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी. ज्या प्रयोजनासाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध करुन दिला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे व सदर तरतूद केंद्र शासनाच्या निकषानुसार खर्च होईल याची दक्षता घ्यावी. सदर रकमेचे वितरण MP-SIMS या शासनाच्या संगणक प्रणालीवर नोंदवण्याची जबाबदारीही प्राधिकरणाची राहील.

६.	महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणावर योजनेअंतर्गत होणा-या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत केंद्र व राज्य शासनास सादर करणे बंधनकारक राहिल. जर वितरीत केलेली रक्कम केंद्र शासनाने ज्या प्रयोजनासाठी वितरीत केली आहे, त्या प्रयोजनासाठी वापरली नाही, तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यात येईल.

७.	या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन/महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरीता / तपासणीकरीता सादर करण्याची प्राधिकरणावर जबाबदारी असेल. सदर लेखाशिर्षकाचे दर महिन्याअखेरचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयातील लेख्याशी ठेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास दर महिनाअखेर सादर करण्यात यावा.

८.	या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्रमांक क्यू-३ मुख्य लेखाशिर्ष २२१६-गृहनिर्माण - ८०, सर्वसाधारण - १०३, गृहनिर्माण मंडळे महामंडळे इत्यादींना सहाय्य- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना

(०५)(०१) शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (केंद्र हिस्सा),३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१६ १४५२) दत्तमत या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

९. हा शासन निर्णय, वित्त विभागांतर्गत व्यय-३ कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५४ दि.२९.१.२०११ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार व नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२१५२२१११२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्र.पु.बडगेरी)
शासनाचे अवर सचिव.

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, (पत्राने)
२. मा.मख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६. मुख्य अभियंता-२, राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, नागपूर,
९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग, नवी मुंबई,
१०. उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोंकण विभाग, नवी मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१२. वित्त नियंत्रक / मुख्य अभियंता-१, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्ाोण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे, मुंबई-४०० ०५१.
१४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१५. मुख्य अधिकारी, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे/नाशिक/ औरंगाबाद /नागपूर,
१६. प्रधान सचिव, वित्त विभाग तसेच वित्त विभागांतर्गत (व्यय-३, अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७. प्रधान सचिव, नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२०. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१. सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२. उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग( संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)
२३. सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई,
२४. उप सचिव / सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५. अवर सचिव/रोखशाखा व आहरण व संवितरण अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२६. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे/ठाणे महानगरपालिका, ठाणे/नाशिक महानगरपालिका, नाशिक/कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, कल्याण.
२७. निवड नस्ती/गृनिधो-२ सेल कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**शासन निर्णय क्रमांक जनेयो-२०१०/प्र.क्र.१०४/गृनिधो-२(सेल) , दि.१५.२.२०११**

**विवरणपत्र**

**BSUP प्रकल्पाकरीता केंद्र शासनाच्या हिश्श्याची प्राप्त रक्कम व त्याचे वितरण.**

रु.लाखात

| अ.क्र | केंद्र शासनाचा (वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाचे) निधी वितरणाचे पत्र क्रं. व दिनांक | शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (BSUP) अंतर्गत प्रकल्पाचे स्थान | रक्कम | हप्ता |
|---|---|---|---|---|
| १. | ५९(४)/PFI/२०१०-९९३, दि.२८.१२.२०१० | १) पिंपरी चिंचवड येथील EWS प्रकल्प | ५६२१.३४ | २ रा |
| | | २) पिंपरी चिंचवड येथील धोकादायक जागेंवर रहाणाऱ्या लाभार्थ्यांकरीताचा प्रकल्प (प्रकल्प १) | ११३०.७० | ३रा |
| | | ३) पिंपरी चिंचवड येथील धोकादायक जागेंवर रहाणाऱ्या लाभार्थ्यांकरीताचा प्रकल्प (प्रकल्प २) | ११३०.७० | ३रा |
| | | ४) ठाणे येथील ८२२ घरकुलांचा प्रकल्प (DPR II) | ३९१.३० | ३ रा |
| २. | ५९(४)/PFI/२०१०-१०७५, दि.१३.१.२०११ | १) नाशिक येथील ७२० घरकुलांचा प्रकल्प (स.क्र. ८१४/८१५) | १६९.६९ | २रा |
| | | २) कल्याण डोंबीवली येथील ८१४२ घरकुलांचा प्रकल्प (DPR -I) | ३८६४.७९ | २रा |
| | | ३) कल्याण डोंबीवली येथील २३७६ घरकुलांचा प्रकल्प (DPR -II) | १५२९.०० | २रा |
| | | ४) नाशिक येथील १८४० घरकुलांचा प्रकल्प (चुंचाले) | ४३३.६० | ३रा |
| | | **एकूण** | **१४२७१.१२** | |